॥ श्री ॥

हिंदुस्थानी संगीतपद्धति

# क्रमिक पुस्तकमालिकां



# सहावें पुस्तक




ग्रंथकार

कै. पं विष्णु नारायण भातखंडे

संपादक

प्रोफेसर श्रीकृष्ण नारायण रातांजनकर

प्रिन्सिपॉल, मॅरिस कॉलेज, लखनौ.

पंडित वाडिलाल शिवराम

प्रिन्सिपॉल, बान्सदा संस्थान संगीत विद्यालय.

प्रकाशक व सह-संपादक

भालचंद्र सीताराम सुकथनकर, एम्. ए., एल् एल्. बी.

सॉलिसिटर, हायकोर्ट, मुंबई.



आवृत्ति पहिली

प्रति ५०००

शके १८५९ ] [ सन १९३७

कागदी, रु. ३-१२-० ] किंमत [ कापडी, रु. ४-४-०

( पोस्टेज निराळें ).

# प्रस्तावना

क्रमिक पुस्तक मालिकेच्या पांचव्या पुस्तकांत एकंदर दहा थाटांपैकीं पहिल्या पांच थाटांतील ६८ अप्रसिद्ध राग, व त्यांतील कै. विष्णु नारायण भातखंडे यांनीं ठिकठिकाणीं फिरून गोळा केलेल्या २५५ खानदानी चिजा दिल्या गेल्या. राहिलेल्या पांच थाटांतील ६८ अप्रसिद्ध राग व त्यांतील २३७ खानदानी चिजा या पुस्तकांत दिल्या जात आहेत. याप्रमाणें ग्रंथकारांनीं मालिकेच्या पहिल्या चार पुस्तकांत, प्रसिद्ध ४५ रागांत प्रसिद्ध केलेल्या सरासरी सव्वा तेराशें चिजा, व त्यांच्या निधनानंतर मालिकेच्या पांचव्या व या सहाव्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या अप्रसिद्ध १३६ रागांतील सरासरी पांचशें चिजा, मिळून जवळजवळ अठराशें अमूल्य चिजांचा सांठा जनतेच्या स्वाधीन आदरपूर्वक केला आहे. " अखिल भारत संगीत परिषदांत " ज्या मल्लार, सारंग व तोडी प्रकारांचीं रागस्वरूपें बहुमतांनीं निश्चित केलीं गेलीं, ते सर्व प्रकार या सहाव्या पुस्तकांत ग्रथित झाले आहेत.

परमपूज्य गुरुवर्यांनीं आपल्या हयातींत माझ्यावर टाकिलेली ही अत्यंत महत्वाची कामगिरी अशा तऱ्हेनीं पुरी होत असल्यामुळें मला आनंद होत आहे. "हिंदुस्थानी संगीत पद्धति" रूपी जो आधुनिक "संगीत रत्नाकर" कै० गुरुवर्यांनीं या अवनितलावर आणिला, त्याचें मंथन करून, आटोपशीर, शाळा व कॉलेजांत सहज शिकवितां येण्याजोगें ७००–८०० पानांचें सार तयार करण्याकडे मला आतां एकाग्रतेनें वळतां येईल; व तें सार या देशांत प्रचलित असलेल्या मुख्य भाषांत भाषांतरित करून फैलावलें म्हणजे मी कृतकृत्य होईन. कार्यबाहुल्यामुळें हें काम जरी मला जितक्या झपाट्यानें पुरें करावयाला हवें आहे, तितकें करितां आलें नाहीं, तरी त्यांच्या उज्ज्वल चारित्र्य-स्फूर्तीनें हें काम मी तडीस नेईन अशी मला उमेद आहे;

व माझ्या हातांनीं तें त्यांनीं पुरें करवून घ्यावें अशी त्यांच्या चरणांपाशीं माझी प्रार्थना आहे.

संपादकद्वयांनीं चिजांच्या आधीं दिलेलीं रागांचीं स्वरूपें, चलन, उठाव वगैरे, व सुरवातीची प्रस्तावना व शेवटीं दिलेले स्वर-विस्तार अत्यंत परिश्रम-पूर्वक तयार केले आहेत. जवळ जवळ असलेलीं राग-स्वरूपें, स्वरूप-वर्णनांत व स्वर-विस्तारांत भिन्न ठेवून दाखविणें हें किती कौशल्याचें काम आहे, हें तें करण्याचा प्रयत्न केल्याशिवाय समजणार नाहीं. अगदीं सारखीं भासणारीं राग-स्वरूपें विशिष्ट स्वर-विन्यासांमुळें, किंवा वादी-भेदानें, किंवा इतर तऱ्हेनें निराळीं ठेविणें, याचेंच नांव 'पद्धति'; व ही पद्धति रोमांरोमांत भिनलेली असल्या शिवाय तें कार्य होणार नाहीं. वर्षानुवर्षे कै० गुरुवर्यांच्या सान्निध्यांत घालविल्यामुळें, संपादकद्वयांनीं हें काम चोख पार पाडलें, यांत नवल नाहीं; व त्याबद्दल त्यांचा गौरव करावा तेवढा थोडाच आहे. सुरवातीस प्रस्तावनेंत दिलेली माहिती फारच उपयुक्त आहे, व तिचा वाचक विचार करून, **पद्धतशीर** गायनवादनाकडे लक्ष लावतील अशी उमेद आहे.

पूर्वी "गीतमालिका" या नांवानें ग्रंथकारांनीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत आलेल्या बहुतेक चिजा क्रमिक पुस्तक मालिकेच्या निरनिराळ्या भागांत समाविष्ट केल्या आहेत; त्यामुळें त्या चिजा "गीतमालिका" या. रूपानें छापण्याची आवश्यकता राहिली नाहीं. क्रमिक पुस्तक मालिकेच्या सहाही भागांत छापल्या गेलेल्या सरासरी अठराशें चिजांची रागानुक्रमानें व वर्णानु-क्रमानें एक सूची मी आतां तयार करीत आहें. तिच्यामुळें अमुक एक चीज कोणत्या रागांत आहे व क्रमिक पुस्तक मालिकेच्या कोठल्या भागांत कोठल्या पानांवर आहे, हें वाचकांस ताबडतोब मिळेल व अभ्यास तेवढा सोपा होईल.

कै. गुरुवर्यांनीं संगीतामृत घरोघरीं पोहोंचतें करण्यासाठीं अत्यंत परिश्रम करून, गेल्या वीस पंचवीस वर्षांत जे प्रयत्न केले, त्यांचीं फळें हळु हळु

देशभर दिसत आहेत. एके काळीं संगीताविषयीं जें औदासिन्य होतें, तें अनिष्ट धुक्यासारखें देशावरून उडून जात चाललें आहे; व गीतानंदाचा प्रकाश चहूंकडे फैलावत जाऊन, जिकडे तिकडे संगीताविषयीं अत्यंत उत्साह व आनंद दृग्गोचर होत आहे. शहरोशहरीं, सालानुसाल संगीत परिषद होत असून, मुलांमुलींच्या तोंडीं देखील खानदानी चिजा ऐकूं येत आहेत; यामुळें त्यांच्या स्वर्गस्थ आत्म्यास अवर्णनीय आनंद होत असेल यांत संशय नाहीं; व याप्रमाणें संगीत—देवालयाचा केला गेलेला जीर्णोद्धार चिरस्थायी करण्याची जबाबदारी अर्थात या व पुढील पिढ्यांवर आहे. त्यांचा मुख्य बाणा शास्त्रशुद्ध गायनवादन हाच होता. प्रत्येक रागस्वरूपाचें सूक्ष्म व मार्मिक परिक्षण करून, त्यांनीं आपल्या "हिंदुस्थानी संगीत पद्धति" ग्रंथांत, कसलेल्या रसायनशास्त्र्यासारखें पृथक्करण करून दाखविलें आहे. जिज्ञासु व रसिक वाचकांनी तीं वर्णनें अवश्य वाचून, मनन करून, आत्मसात् करावी, व त्याच ढंगानें आपलें गायनवादन शास्त्रशुद्ध ठेवावें असा प्रेमपूर्वक आग्रह आहे. नुसतें गळा फिरेल तशा तानांच्या लकेऱ्या फेकण्यांत कौशल्य नसतें; पण त्याच तानेस शास्त्रशुद्ध वळण दिलें तर ती अवर्णनीय आनंद उत्पन्न करूं शकते. आपण आपल्या गायनवादनानें श्रोत्यांची अभिरुची वळवीत असतों, ही गोष्ट कलावंतानें विसरून चालणार नाहीं; व श्रोत्यांची रुची भ्रष्ट करणें, हें शास्त्रदृष्ट्या अश्लाघ्य आहे. मनुष्याच्या अनियंत्रित हातवाऱ्यांत, आणि नर्तकाच्या वळणदार अंगविक्षेपांत किती फरक असतो हें कोणालाही समजेल. याच कारणास्तव प्रत्येक विद्यार्थ्यानें, अत्यंत मेहनत करून गळ्यावर किंवा वाद्यावर पूर्ण काबू मिळविला पाहिजे; व शुद्ध रागस्वरूप कायम नजरेपुढें ठेवून, त्या मूर्तीचा किंवा त्या रसाचा भंग होऊं न देतां आपलें गायनवादन केलें पाहिजे. याचा अर्थ असा नाहीं कीं, कोणी नवीन रागस्वरूपनिर्मितीला पायबंद घालत आहे. तशी निर्मिती जबाबदार कलावंतांनीं राग-नियमांकडे व गीत-नियमांकडे लक्ष लावून केल्यास, तें संगीत परिवर्तन दृष्ट्या, इष्टच आहे. पण अशी रागरचना चालेल तों ग्रंथाधारानेंच व्हावी.

हीं दोन्हीं पुस्तकें मुंबई वैभव छापखान्याचे चालक रा. रा. भास्करराव सिद्धये यांनीं अल्पावधींत व परिश्रमपूर्वक छापून दिल्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

कै. गुरुवर्यांनां दिवंगत होऊन नुकतेंच एक वर्ष पुरें झालें. येवढ्यांत त्यांचीं हीं शेवटचीं दोन्हीं पुस्तकें छापून निघालीं, म्हणून मला आनंद होत आहे. दयाघन परमेश्वरानें त्यांची आयुर्मर्यादा थोडीशी वाढवून, हीं दोन्हीं पुस्तकें त्यांनां या मृत्युलोकींच दाखविलीं असतीं, तर माझ्या आनंदांत कल्पनातीत भर पडली असती. परंतु भवितव्यतेपुढें सर्वांनीं मान लवविलीच पाहिजे.

येवढी प्रस्तावना करून, हा ग्रंथ मी आज बलिप्रतिपदेच्या सुमुहूर्तावर जनताकरकमलीं ठेवून, वाचकांची रजा घेतो.

शांताराम हाउस, वाळकेश्वर, मुंबई
२ नोव्हेंबर १९३७, बलिप्रतिपदा,
कार्तिक शुद्ध १ शके १८५९

**भालचंद्र सि. सुकथनकर**
प्रकाशक व सह-संपादक

# वस्तुसंग्रह.



## शास्त्रीय माहिती



ग्रंथकार : पंडित विष्णु नारायण भातखंडे, बी. ए., एल्एल्. बी.

( " चतुर पंडित " )

जन्म : गोकुलाष्टमी शके १७८२ — मृत्यु : गणेशचतुर्थी शके १८५८

ता. १० ऑगस्ट १८६० — ता. १९ सप्टेंबर १९३६

" मद्भक्ता : यत्र गायंते तत्र तिष्ठामि नारद "

# वस्तुसंग्रह.



## शास्त्रीय माहिती

## चीजांचा संग्रह

# शिक्षकांस सूचना.

१ हवा तो ध्वनि षड्ज कल्पून विद्यार्थ्यांस त्या स्वरांत येऊन मिळण्यास प्रथम शिकवावें. प्रत्येक वेळीं **सा** स्वर शिक्षकानें मोठ्यानें व सावकाश असा म्हणावा. असें वारंवार रोज करीत जावें.

२ विद्यार्थ्यांस आपणाबरोबर स्वर म्हणूं देऊं नये. त्यांनीं ते ऐकूनच म्हणावे.

३ विद्यार्थ्यांस चोरटा आवाज लावूं देऊं नये.

४ एका वेळीं तिहींपेक्षां अधिक विद्यार्थ्यांना स्वर म्हणूं देऊं नये.

५ स्वर शिकवितांना फळ्याचा उपयोग पहिल्यापासूनच करूं लागावें व विद्यार्थ्यांस स्वर वाचण्याची संवय करवावी.

६ विद्यार्थ्यांच्या स्वरस्थानांकडे, श्वासोच्छ्वासाकडे व त्यांना होणाऱ्या श्रमाकडे लक्ष असूं द्यावें.

७ सरगमी शिकवूं लागण्यापूर्वीं वारंवार केलेल्या अभ्यासानें विद्यार्थ्यांस स्वरओळख बरीच झालेली असावी. सरगमीच्यामुळें मुख्यतः रागज्ञान होतें, म्हणून त्या नीट म्हणवून घेण्याची खबरदारी घ्यावी.

८ स्वर शिकवूं लागण्यापूर्वीं **ताल** व त्यांच्या **मात्रा** प्रथम विद्यार्थ्यांस शिकविणें बरें. निदान **सरगमी** शिकविण्यापूर्वीं विद्यार्थ्यांस तालमात्रांचें उत्तम ज्ञान झालेलें असावें.

९ चिजांचे **बोल** शिकविण्यापूर्वीं प्रत्येक ओळ **स्वरांनीं** तेथल्या अलंकारांसह म्हणतां यावी.

१० शुद्ध स्वरांचे धडे चांगले वाचतां आल्यावर विकृत स्वराभ्यासाकडे वळावें. विकृत स्वर बहुधा अर्धांतरें असल्यामुळें, ते शिकवितांना **गम** व **निसा** या विद्यार्थ्यांच्या तयार झालेल्या अर्धांतरांचा उपयोग करावा. जसें **मंप** या स्वरांना मधूनमधून **निसा** म्हणवावें. विकृत स्वर केव्हां व कसे शिकवावयाचे, हें शिक्षकाच्या दूरदृष्टीवर व हुषारीवरच अवलंबून राहील.

# या पुस्तकांत योजिलेल्या चिन्हांचा खुलासा

**रे, ग, ध, नि,** या स्वरांच्या खालीं आडवी रेघ असली, तर ते कोमल आहेत असें समजावें; तशी नसली तर तीव्र समजावें.

**म** असा लिहिलेला, शुद्ध अथवा कोमल समजावा.

**मं** असा लिहिलेला, तीव्र समजावा.

• ज्या स्वरांच्या खालीं बिंदु असेल ते **मंद्र** स्थानचे, व ज्यांच्या माथ्यावर बिंदु असेल ते **तार** स्थानचे समजावे.

बिंदूशिवायचे सारे स्वर **मध्य** सप्तकाचे समजावे.

‿ अशा चिन्हांत लिहिलेले स्वर एका मात्रेच्या कालांत गावयाचे आहेत.

⁀ हें चिन्ह कोणत्या स्वरापासून कोणत्या स्वरापर्यंत **मींड** ( एका स्वरावरून दुसऱ्या स्वरावर घर्षणानें जाणें ) आहे, हें दाखवितें.

– स्वरापुढें हें चिन्ह असेल, तेथें तो स्वर एक मात्रा लांबवावयाचा आहे. अथवा चिन्हच नसेल तर तितकी विश्रांति आहे असें समजावें.

ऽ गीताच्या शब्दांत जेथें हें अवग्रह चिन्ह असेल, तेथें मागच्या अक्षरांतला अंत्य स्वर ( अकार, उकार इ. ) एक मात्रा लांबवावा.

( ) स्वराला असा कंस केला असेल, तर त्याच्या पुढचा स्वर, तो स्वर, त्याच्या मागचा स्वर, व पुनः तो स्वर, असे चार स्वर एका मात्रेंत म्हणावें, जसें:—( प )=धपमप; ( म )=पमगम; ( सा )=रेसानिसा.

कोठें कोठें स्वरांच्यावर डाव्या बाजूला लहान टाइपानें छापलेले **स्वर** आहेत, त्यांस ( '**ग्रेस नोट**' ) अलंकारिक स्वर म्हणतात. हे बारीक **कण** नवीन विद्यार्थ्यांस गळ्यानें म्हणतां न आले, तरी त्यांच्या अभावीं रागहानि होणार नाहीं. ते लावतां आल्यानें गायन अधिक रंजक होईल.

× हें चिन्ह गायनाच्या तालाची **सम** दाखवितें. **सम** हा पहिला ठोका मानून पुढील ठोके त्याच्या धोरणानें समजावेत.

० हें चिन्ह तालाची **खाली** म्हणजे रिकामी जागा दाखवितें.

# क्रमिक पुस्तकांत आलेल्या तालांचे मात्रानियम व बोल

—— :o: ——

## ताल दादरा

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा— | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | |
| ठेका— | धीं | धीं | धा | धा | ती | ना | तबला. |
| ,, | धीं | तीं | धा | ,, | ,, | ,, | ,, |
| | × | | | ० | | | |

## ताल तीव्रा

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा— | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | |
| थपिया— | धा | दीं | ता | तिट | कत | गदि | गन | पखवाज. |
| | × | | | २ | | ३ | | |

## झपताल

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा— | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | |
| थपिया— | धा | ऽ | धा | गी | की | ट | कड | धा | की | ट | पखवाज. |
| ठेका— | धी | ना | धी | धी | ना | ती | ना | धी | धी | ना | तबला. |
| | × | | २ | | | ० | | ३ | | | |

## मूलताल

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा— | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | |
| थपिया— | धा | धा | दीं | ता | किट | धा | तिट | कत | गदि | गन | पखवाज. |
| | × | | ० | | २ | | ३ | | ० | | |

## चौताल

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा— | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | |
| थपिया— | धा | धा | दीं | ता | किट | धा | दीं | ता | तिट | कत | गदि | गन | पखवाज. |
| | × | | ० | | २ | | ० | | ३ | | ४ | | |

## एकताल

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा– | १ २ | ३ ४ | ५ ६ | ७ ८ | ९ १० | ११ १२ | |
| ठेका– | धीं धीं | धागि तृक | तूं ना | क त्ता | धीं तृक | धीं ना | तबला. |
| | × | ० | २ | ० | ३ | ४ | |

## आडाचौताल

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा– | १ २ | ३ ४ | ५ ६ | ७ ८ | ९ १० | ११ १२ | १३ १४ | |
| ठेका– | धीं तिरकिड | धीं ना | तूं ना | क त्ता | तिरकड धी | ना धी | धी ना | त० |
| | × | २ | ० | ३ | ० | ४ | ० | |

## ताल झूमरा

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मात्रा– | १ २ ३ | ४ ५ ६ ७ | ८ ९ १० | ११ १२ १३ १४ | |
| ठेका– | धीं ऽ धा,तृक | धीं धीं धागि तृक | तीं ऽ ता,तृक | धीं धीं धागि तृक | त० |
| ” | धीं धीं नत | ” ” ” ” | तीं तीं नत | ” ” ” ” | ” |
| | × | २ | ० | ३ | |

## ताल धमार

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मात्रा– | १ २ ३ ४ ५ | ६ ७ | ८ ९ १० | ११ १२ १३ १४ | |
| थपिया– | क धि ट धि ट | धा ऽ | क त्ति ट | ति ट ता ऽ | पखवाज. |
| | × | २ | ० | ३ | |

## ताल दीपचंदी

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मात्रा– | १ २ ३ | ४ ५ ६ ७ | ८ ९ १० | ११ १२ १३ १४ | |
| ठेका– | धीं धीं ऽ | धा ग तीं ऽ | ता तीं ऽ | धा ग धीं ऽ | तबला. |
| | × | २ | ० | ३ | |

## तिलवाडा

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मात्रा– | १ २ ३ ४ | ५ ६ ७ ८ | ९ १० ११ १२ | १३ १४ १५ १६ | |
| ठेका– | धा तृक धीं धीं | धा धा तीं तीं | ता तृक धीं धीं | धा धा धीं धीं | तबला |
| | × | २ | ० | ३ | |

## त्रिताल ( पंजाबी )–हा विलंबित त्रिताल आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मात्रा– | १ २ ३ ४ | ५ ६ ७ ८ | ९ १० ११ १२ | १३ १४ १५ १६ | |
| ठेका– | ता धीं धीं धा | धा धीं धीं धा | धा तीं तीं ता | ता धीं धीं धा | तबला. |
| | × | | ० | ३ | |

## ताल पंजाबी

| | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा- | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| | × | | | | २ | | | | ० | | | | ३ | | | |

## ब्रह्मताल

| | | | | | | | | | | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ | २५ | २६ | २७ | २८ |
| × | | ० | | २ | | ३ | | ० | | ४ | | ५ | | ६ | | ० | | ७ | | ८ | | ९ | | १० | | ० | |

## रूपकताल

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा— | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ठेका— | धीं | धा | तृक्र | धीं | धीं | धा | तृक्र |
| | × | | | २ | | ३ | |

## ताल गजझंपा

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा- | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ |
| ठेका- | धा | धिन | नक | तक | धा | धिन | नक | तक | धिन | नक | तक | किट | नक | गांदे | गिन |

## शिखरताल

| | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा- | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ |
| ठेका- | धा | तृक | धिन | नक | थुं | गा | धिन | नक | धुम | किट | तक | धत् | धा | तिट | कत | गदि | गिन |
| | × | | | | | | ० | | | | | | ३ | | ४ | | |

## मत्तताल

| | | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मात्रा- | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ |
| ठेका- | धा | ऽ | धि | ड | न | क | धि | ड | न | क | ति | ट | क | त | ग | दि | गि | न |
| | × | | ० | | २ | | ३ | | ० | | ४ | | ५ | | ६ | | ० | |

# रागांची अनुक्रमणिका.



### राग (६८) चीजा (१३७)

॥ श्री ॥

# सहावें पुस्तक



## मंगलाचरण

गजाननं सिद्धिनाथं सर्वमंगलकारिणम् ।
वन्देऽत्रकार्यपूर्त्यर्थम् रागताल महोत्सवे ॥

प्रस्तुत मालिकेच्या आंतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पांच भागांतून आपल्या प्राचीन, मध्यकालीन व अर्वाचीन संगीताची शक्य तितकी माहिती आलीच आहे. आतां या मालिकेंतला हा शेवटचा ग्रंथ छापला जात आहे. ग्रंथकारांनीं अविश्रांत मेहनतीनें, व कल्पनातीत स्वार्थत्यागानें मिळविलेल्या अमूल्य खानदानी चिजांच्या ठेव्याचा हा शेवटचा घटक जनतेच्या स्वाधीन केला जात आहे. रागांचीं शुद्ध स्वरूपें, व चिजांचे बोल, आजकालचे गुमत्या ऐकून उडविलेल्या चिजा गाणार गवई, किंवा स्वयंमन्य "संगीताचार्य" किंवा "संगीतकलानिधि", "अपने अपने तानमें चिडियां हैं मस्तान" या न्यायानें, भ्रष्ट करून लोकांपुढें गात असतात व लोकाभिरुचि बिघडवीत असतात. तेव्हां सदर रागांचीं खरी ग्रंथगत स्वरूपें काय आहेत, व चिजांचे शुद्ध बोल काय आहेत, हे लोकांपुढें मांडण्याचा या मालिकेचा प्रयत्न आहे; व रसिक गुणीजन त्याचा योग्य तो उपयोग करून घेतील अशी आशा आहे. प्रत्येक रागाचें एक विशिष्ट व इतर सर्व रागांहून भिन्न असें स्वरूप असतें. व त्या स्वरूपामुळें अमुक एक विशिष्ट रंग उत्पन्न होत असतो. तेव्हां एखादा राग सुरू करून त्यांत नंतर तीन चार दुसऱ्या रागांचीं मिश्रणें करीत बसण्यांत शहाणपणा तर नसतोच, पण उलट अश्लाघ्य असा रसहानीचा

दोष मात्र पदरीं येत असतो. कोणीहि घरंदाज गवई असें करीत नाहीं. रागस्वरूप शेवटपर्यंत कायम ठेवण्यांतच खऱ्या गायकाची किंमत असते; व विद्यार्थ्यांनीं, या मालिकेंत व "हिंदुस्थानी संगीत पद्धतींत," विस्तृत वर्णिलेलीं राग-स्वरूपें कसून प्रयत्न करून आत्मसात् केलीं पाहिजेत, व आपलें गायन त्या स्वरूपांस धरून शुद्ध ठेविलें पाहिजे. तानालाप करतांना, फारच काळजी घेऊन इतर कोणत्याहि रागाची यत्किंचित छटाही दिसणार नाही अशी खबरदारी घेतली पाहिजे; तरच तें गाणें पद्धतशीर गाणें समजलें जाईल.

## प्राचीन व मध्यकालीन संगीतांत होत जाणारा फरक

संगीत, अर्थात् देशी संगीत, हें परिवर्तनशील असल्यामुळें कालावधीनं त्यांत फरक होत जाणें अपरिहार्य आहे. तदनुसार मुसलमानी अंमलाच्या काळीं आपलें संगीत प्राचीन ग्रंथोक्त संगीताला बरेंच सोडून गेलेलें असें होतें. त्यांतहि पुढें बदल होत होत आजच्या आपल्या संगीताला मध्य-कालीन संगीतापासूनहि वेगळेंच स्वरूप आलें आहे. आणखी कांहीं काळानें यांतहि फरक होत जाईल. प्रचलित रागांचीं स्वरूपें बदलतील, व नवे नवे राग, नव्या धर्तीचीं गीतें, नवे नवे गाण्याचे ढंग, क्वचित पाश्चात्य संगीताचेंहि मिश्रण हीं प्रचारांत येतील. तशीं चिन्हेंहि हल्लीं दिसूं लागलीं आहेत. यांत कांहीं नवीन नाहीं. देशी संगीताचा हा स्वभावच आहे. त्याचा उद्देश लोक-रञ्जनच असतो, अर्थात् त्याची वाढ लोकरुचीला अनुसरून होणें साहजिक आहे. तथापि प्राचीन संगीत लुप्त होण्याला, मध्यकालीन व अर्वाचीन संगीतांत एवढी तफावत पडण्याला, व आजकालच्या मनसोक्त मतभेदांना, स्वरलिपीचा व विषयाचें स्पष्ट व निश्चयात्मक विवरणाचा अभाव, हाच बहुतांशीं कारण आहे हें येथें नमूद केलें पाहिजे. आजच्या संगीताला आधार मुख्यतः शिष्यानुशिष्यपरंपरेचा आहे. अशा परिस्थितींत आपल्या वेळीं रूढ व सर्वमान्य झालेल्या संगीत तत्त्वांचें पद्धतवार स्पष्टीकरण करणें

तदनुसार कार्याकार्यांचें यथायोग्य दिग्दर्शन करणें, तद्विषयक आदर्श माजापुढें ठेवणें, प्रचलित संगीताच्या परंपरेचा शक्य तितका शोध लावणें यापुढें त्याची प्रगति कोणत्या दिशेनें होणें इष्ट आहे याची चर्चा करणें च संगीतशास्त्रकाराचें कर्तव्य आहे.

प्राचीन संगीताचे उपलब्ध असे आधार ग्रंथ म्हणजे नारदीशिक्षा, डूकीशिक्षा, भरतनाट्यशास्त्रांतला कांहीं भाग, बृहद्देशी व संगीत रत्नाकर मानले जातात. पण या ग्रंथांचा खुलासा श्रुति, स्वर, ग्राम, मूर्च्छना व जाति च्या यथायोग्य सिद्धीवर अवलंबून आहे. आतां यांची सिद्धि परस्परावलंबी सून त्यांचे त्या काळचे अर्थ आज लुप्त झाल्यामुळें हे ग्रंथ आतां दुर्गमच ले आहेत. तरी हा भाग कोणीं तदनंतर प्रचारांत आलेल्या तत्त्वांचा धार न घेतां, त्या ग्रंथांतूनच शोध करून समजाविल्यास हवाच आहे.

मध्यकालीन ग्रंथांचीं शुद्ध स्वरसप्तकें कर्णाटकी पद्धतींत ' कनकांगी ' हिंदुस्थानी पद्धतींत ' सैंधवी ' ( आजची काफी ) हीं सिद्ध झाल्यामुळें ग्रंथ आतां कोणासही सहज समजण्यासारखे झाले आहेत. या ग्रंथांचे ळींहि प्राचीन ग्राम, मूर्च्छना, जातींची पद्धति नष्ट होऊन, दक्षिणेंत यजनक ( थाट-राग ) व्यवस्था व उत्तरेंत कांहीं ठिकाणीं राग-रागिणी वस्था, व कांहीं ठिकाणीं जन्य-जनक व्यवस्था प्रचलित झालीं होतीं हें सहज ांत येईल. या ग्रंथांत वर्णिलेल्या रागांपैकीं कांहीं लुप्त झाले आहेत व कांहींचीं ादींच वेगळीं रूपांतरें आज प्रचारांत आहेत. या ग्रंथांत पुनः पुष्कळ ाणीं आपसांत मतभेद आढळतो. तेव्हां त्यांचा आजच्या संगीताला धार ग्रंथ म्हणून उपयोग क्वचितच होईल. अलबत् ज्या रागांचे बाबतींत ोंच्या प्रचारांचें व या ग्रंथांचें अंशतः तरी एकमत असेल तेथें ते आधार ापुरते जरूर कामीं येतील. अशी एकवाक्यता " हिंदुस्थानी संगीत ति " या शास्त्रीय ग्रंथांत कांहीं रागांचे वर्णनांत पटविलीहि आहे.

## गेल्या शेंदोनशें वर्षांतील प्राकृत व उर्दू संगीत ग्रंथ

मुसलमानी अंमलाचे शेंवटीं शेंवटीं म्हणजे अलीकडील सुमारें दोनशें वर्षांच्या अवधींत कांहीं उर्दू व हिंदी ग्रंथ संगीतावर लिहिले गेले, त्यांपैकीं तोफत्–उल्–हिंद, नगमाते–आसफी, सरमा-ए-अशरत्. राधागोविंद संगीत-सार, संगीत कल्पद्रुम, व नादविनोद हे मुख्य होत. या ग्रंथांत त्या वेळीं प्रचलित असलेल्या रागांचीं स्वरूपें स्वरांनीं लिहिलेलीं सांपडतात. त्यांतले पुष्कळस आज प्रचारांत आहेत. व त्यांचीं स्वरूपें प्रचाराशीं मिळतीं येतात. येवढ्यापुरताच या ग्रंथांचा उपयोग होऊं शकेल. यांतील शास्त्रीय भाग विश्वासनीय नाहीं. या ठिकाणीं " प्रचार " हा शब्द घराणेदार चीजांतून दिसून येणारा रागांचे स्वरूपांचा प्रचार या अर्थीं आम्हीं योजिला आहे.

यानंतर गेल्या पन्नास पाऊणशें वर्षांपासून राजेरजवाड्यांच्या पदरीं असलेल्या मोठमोठ्या नामांकित गायकवादकांचा संबंध साधारण जनसमाजाशीं येऊं लागला, रागदारी संगीताचा प्रसार लोकांत होऊं लागला, व या विषयाची तात्त्विक चिकित्सा सुरू झाली.

## मध्यकालांतील रागवर्गीकरणें

मध्यकालीन संगीतांतील राग-रागिणींचीं स्वरूपें आज बरींच पालटून गेलीं आहेत. त्यामुळें त्या वेळच्या राग-रागिणींचीं वर्गीकरणें आज कामीं येणार नाहींत. शिवाय या वर्गीकरणांच्या मूळतत्त्वांचा खुलासा तोंडीं किंवा ग्रंथांत कोठेंच उपलब्ध नसल्यामुळें तसल्या प्रकारचीं नवीं वर्गीकरणें प्रचारांत आणणें सुलभ नाहीं. आजकालच्या अप्रसिद्ध रागांविषयींच्या साधार निरा-धार सर्व प्रकारच्या मतभेदांकडे पाहतां तसला प्रयत्न यशस्वी होईलच अशी खात्री देतां येत नाहीं. पुढें मागें अनुकूल परिस्थितींत तें काम साधल्यास उत्तमच. नाहींपेक्षां समंजस अशी जन्य-जनक ( थाट राग ) व्यवस्था स्वीका-रून चालणेंच आजच्या संगीताला हितावह होईल. या पद्धतीला पूर्वाचाराचाहि

आधार आहे. दक्षिणचे सर्व ग्रंथकार व उत्तरेचे लोचन, श्रीनिवास, हृदयनारायणदेव हे आपले राग याच पद्धतीनें समजावितात.

## आजकालचा श्रुतिस्वरवाद

आजकाल श्रुतिस्वरवादाला बरेंच महत्त्व येत चाललें आहे. प्रत्येक रागाचीं स्वरांतरें वैज्ञानिक उपकरणांचे मदतीनें व गणितानें सिद्ध करून तीं नियमित करण्याकडे आमच्या संगीत-गणित्यांचें लक्ष वेधलें आहे. या अव्यापारेषु व्यापारापासून प्रचलित संगीताला तादृश लाभ होणार नाहीं असें आमचें मत आहे. सूक्ष्म स्वरांतरान्वयें केलेली रागरचना अतिक्लिष्ट होणार. तशांत हीं स्वरांतरें भरत व शार्ङ्गदेव यांचे पदरीं बांधल्यानें त्यांचा गौरव होण्याऐवजीं त्यांना अन्यायच होईल.

## रागाची व्याख्या व तींतील ‘स्वर’ व ‘वर्ण’ या शब्दांचें महत्त्व

योऽयंनिध्वनिविशेषस्तु स्वरवर्ण विभूषितः ।
रञ्जको जनचित्तानां स रागः कथ्यते बुधैः ॥

अशी रागाची व्याख्या पूर्वापार चालत आली आहे. यांत ‘ ध्वनि ’ हा शब्द एकाच आवाजाचा वाचक नसून तो विशिष्ट नादरचना दर्शवितो. ध्वनींचें समष्टिरूप येथें उद्दिष्ट आहे. उर्दूत याला ‘नगमा’ असें म्हणतात. या व्याख्येंत ‘ स्वर व ‘ वर्ण ’ हे शब्द सूचक आहेत. रागरचना स्वरांनींच झाली पाहिजे. श्रुतिभेदांनीं अगणित मूर्च्छना किंवा मेल उत्पन्न करून त्यांत राग अवघे शेंदोनशें आम्हीं गाणार; म्हणजे, “ मीयां मूठ, दाढी सवाहाथ ” अशी अनवस्था होणार. अहोबल पंडितांनीं पारिजातांत पहिल्यानें एकुणतीस स्वर सांगून त्यांत एक, एक, श्रुतिभेदानें असंख्य मूर्च्छना व कूटताना सांगितल्या. पण रागाध्यायांत पुनः या एकुणतिसांपैकीं कांहीं ध्वनिसाम्यामुळें, व बाकीचे रागांत वापरण्यांत येणार नाहींत म्हणून एकंदर सतरा स्वर सोडून राहिलेल्या बारा स्वरांवरच आपली राग-

रचना सांगितली आहे. हे बारा स्वर बहुतेक आज आपण वापरतों तेच आहेत. रत्नाकरांत देखील बावीस श्रुतींचें वर्णन करून त्यांपैकीं चौदाच घेऊन त्यांना स्वर म्हणून त्यांवर रागव्यवस्था समजाविली आहे.

फक्त एकाच श्रुतिभेदानें दोन राग निरनिराळे मानण्यास आजचे कोणी गायकवादक कबूल होणार नाहींत. त्यांतून श्रुतींचें नियतप्रमाण आम्हांपाशीं नाहींच. एकाच रागांत एकाच स्वराच्या जागा गमक भेदांनीं व निरनिराळ्या स्वरोच्चारांनीं व स्वरसंगतिमुळें उंचनीच होत असतात हा अनुभव प्रत्यक्ष गाणाऱ्या वाजविणाऱ्यांस वारंवार येतो. भैरवाचे री, ध, कानड्याचे ध, ग, मीयांमल्लाराचे नि, ग, ललिताचे मं, ध, देशाचा ध, वसंताचे मं, ध इ. यांच्या जागा कोठें कोठें व किती कायम करणार? करितां, कोमल, तीव्र या स्वरांच्या मर्यादा स्वीकारून सर्वमान्य झालेल्या बारा स्वरांवरच रागरचना करणें हाच सरळ व सुलभ मार्ग होय. रागव्यवस्थेस बाराच स्वर पुरे आहेत. सूक्ष्मान्तरित नाद एवढीच श्रुतींची कल्पना आजच्या संगीताला उपयोगी आहे. बारा स्वरांव्यतिरिक्त बाकीच्या स्वरांस अलंकारिक, तीव्र कोमलांच्याच अंतर्गत, रागांत येणाऱ्या विविध स्वरसंगतीमुळें, गमकांमुळें किंवा स्वरोच्चारांमुळें लागणारे स्वर, असे मानणेंच योग्य होईल. आमच्या संगीतांत "हार्मनी" (विविध स्वरांचें सहोच्चारण) दाखल होईल तर व तेव्हां सूक्ष्म स्वरांतरें कायम करणें प्राप्तच होईल. पण "हार्मनी" आली म्हणजे राग नष्टच होणार. तोपर्यंत रागांच्या हयातीतच त्यांची उत्तरक्रिया नको आहे. प्राचीन काळीं ध्वनि मापण्याचीं यंत्रें नसल्यामुळें, अमुक एक स्वराच्या पुढील स्वर कोठला हें समजविण्यापुरताच श्रुतींचा उपयोग होता, असें कांहीं विद्वानांचें मत आहे, तें देखील विचार करण्यासारखें आहे. एका ध्वनिपासून दुसरा ध्वनि स्पष्ट निराळा ओळखूं येण्यासारखा जरासा चढवला म्हणजे एक श्रुत्यंतर झालें. अमुक एक स्वर 'नी' कल्पून, पुढें अशीं तीन श्रुत्यंतरें ओलांडून येईल त्या चौथ्या श्रुत्यंतरावर

आमचा " सा, " आहे अशी स्वरवर्णनें आपले प्राचीन पूर्वज देत असत, व तवढाच श्रुतींचा उपयोग असे. पुढें असें अनिश्चित प्रमाण निरुपयोगी समजलें जाऊन, स्वरांची ठिकाणें, वाद्यावरील तारेची लांबी, पडद्यांच्या आधारें किंवा तारेवर बोटें ठेवून, कमी कमी करीत नेऊन समजावलीं जाऊं लागली. व आतां तर ती यंत्रानें, अनुरणनाच्या मापानें सांगितली जातात. तेव्हां आतां श्रुतींचा मुळींच उपयोग नाहीं, असें कोणी म्हणतात, यांतहीं कांहीं तथ्य नाहीं असें म्हणतां येणार नाहीं.

## " जाति " हें निबद्धगान असावें

राग गायनाचे पूर्वी, जातींचें गायन असे, असें कळते. या जातींचीं प्रत्यक्ष ध्वनिरूपें आज उपलब्ध नाहींत; तीं प्राचीन ग्रंथांतून त्यांच्या शुद्ध स्वर मेळांच्या यथार्थ सिद्धीच्या अभावीं शोधून काढणें दुरापास्तच आहे. पण जातींच्या रचनेच्या तत्त्वांवरून व रत्नाकरांत दिलेल्या त्यांच्या उदाहरणां-वरून जाती हा एक प्रकारची निबद्धगीतेंच (बांधलेलीं गीतें) असावींत असें कोणी म्हणतात. प्रत्येक जातीचे ग्रह, अंश, न्यास, मंद्रतारांच्या मर्यादा, इतकेंच नाहीं तर तालहि ठरलेले असत. जातींच्या गायनांत गाणाराला आपल्या पदरचें कांहींएक योजण्याची मोकळीक नसे.

## रागालाप

या जातींतूनच पुढें रागांची उत्पत्ति झाली व हे नियम थोड्याफार प्रमाणांत रागांना लागूं लागले. रागगायनांत आलापांचा प्रचार पुढें आला. शास्त्रोक्त क्रम नियमांना अनुसरून गायकाला आपल्या अंगस्वभावानें रागाचा विस्तार करण्याची मोकळीक रागालापांत मिळाली. पुढेंपुढें नियमांकडे दुर्लक्ष होत गेलें. त्यांच्या योजनेंतहि फरक होऊं लागला. आजकाल तर हे जुने नियम नष्टप्रायच झाले आहेत. आज अमुक राग अमुकच स्वरावरून सुरू केला पाहिजे व अमुकच स्वरावर संपविला पाहिजे असा नियम नाहीं. चीजांतहि हीच स्थिति अनुभवास येते.

## वादीसंवादी

प्राचीन पारिभाषिक शब्दांचे अर्थहि आज बदलले आहेत. प्राचीन काळीं वादीसंवादी अनुवादी व विवादी हे त्या त्या स्वरांच्या आपसांत असलेल्या ध्वनिसंबंधावर अवलंबून असत. पण हे संबंध प्राचीन ग्रंथकारांनीं श्रुतिंच्याच परिभाषेंत वर्णन केल्यामुळें त्यांचा व स्वयंभू षड्जपंचम भाव, षड्जमध्यम-भाव वगैरेसारख्या गणिती संवादांचा मेळ बसत नाहीं. भरत—शार्ङ्गदेवाच्या उक्तींना अनुसरून, श्रुति नियतप्रमाणाची स्वीकारिल्यास, नादशास्त्राच्या गणिती तत्त्वांना बाध येतो. प्राचीन ग्रंथांना क्षणभर बाजूला सारून आजच्या रागांना गणित लावून पाहावें तर तेंहि जुळत नाहीं.' कारण वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें आपले बहुतेक स्वर "चल" आहेत. ते निश्चल असते तर त्यांना गणिताची दोरी लावून अडकविलें असतें. सारांश, आज वादीसंवादींचा अर्थ बहुत्वाल्पत्वाच्या तत्त्वाला अनुसरून केला जातो. "प्रयोगे बहुलःस्वरः। वादी राजाऽत्र गीयते॥ विवादी तु सदा त्याज्यः। क्वचित्तान क्रियात्मकः"॥ इत्यादि व्याख्याच आजच्या वादीविवादींचे आधार आहेत. साधारणतः वादीपासून संवादी ५ वा किंवा ४ था असावा हा नियम आजकाल सर्वमान्य आहे.

## रागगायन म्हणजे काय ?

ठराविक स्वरपंक्तिला, ठराविक क्रमनियमांनीं, तितिल स्वरांचें परस्पर वजन, अर्थात् बहुत्वाल्पत्व राखून, तिचें वैशिष्ट्य न बिघडूं देतां, मेहनतीनें कमाविलेल्या आवाजांत, अथवा हस्तकौशल्यानें वाद्यांवर, आपल्या अंगस्वभावानें व अनुभवचातुर्यानें रंगवून आळविणें, यालाच आम्ही आज " राग संगीत " किंवा " रागदारी संगीत " म्हणतो. हल्लींच्या रागरचनेचे व रागविस्ताराचें कांहीं ठळक नियम या मालिकेच्या पांचव्या भागांत दिलेच आहेत.

# आवाजाची कसरत व तानालाप

आपल्या संगीतांत गायन हें प्रधान आहे. वादनाला व नर्तनाला आधार ताचाच आहे अशी आपल्या येथें सर्वसाधारण समजूत आहे.

गायनाचें मुख्य अंग कंठस्वर ( आवाज ) आहे. विशेष मधुर आवाज ईश्वरदत्त असतो असें मानलें, तरी गाण्यास निरुपयोगी असा आवाज सणारीं माणसें फारच विरळा. शेंकडा ९५ माणसांचा आवाज गाण्या-यक होऊं शकतो. साधारण आवाज असलेल्या माणसांना कसरतीनें तो रेल बनवितां येतो. ही आवाज बनविण्याची कसरत योग्य रीतीनें झाली हिजे. या महत्त्वाच्या बाबतींत आमच्या येथें बरेंच औदासिन्य दिसून ते. आवाज चांगला बनण्यास मुख्य तीन गोष्टींची जरूर आहे.

(१) आवाज योग्य रीतीनें काढणें

(२) आवाज स्थिर राहणें व

(३) श्वासनियंत्रण

योग्य रीतीनें आवाज काढण्याची तालीम न मिळून, चुकीच्या कसरती-ळें आवाज सुरेल बनण्याऐवजीं बिघडल्याचीं उदाहरणें आमच्या येथें ष्कळ सांपडतात. खुद्द गाण्यावर पोट भरणाऱ्या लोकांत कसलेला आवाज सलेले लोक शेंकडा वीसाहि मिळणें कठीण आहे. गाण्याचा रियाझ रतांना आवाज चोरटाहि काढूं नये व जोरानें कर्कश वाटेल किंवा खोकला इल असाहि काढूं नये. चोरट्या आवजांत गाऊन कितीहि मेहनत केली तरी फळास येणार नाहीं. तसेंच फार जोरानें आवाज काढला तर तो कर्कश व ड होईल. आवाज नेहमीं 'आ' कारांत काढावा. 'अॅ' असा रेंकल्यासारखा वा "ऑ" असा फार गोल असा आवाज काढणें हीं दोन्हीं दोषास्पद ाहेत. "आ" कारांत आवाज काढणें अंगवळणीं पडलें म्हणजे 'इ' रं, 'उ' कार, 'ओ' कार हे पण चांगले सुस्वर येऊं लागतील. यांचा ण्यांत फार कमी उपयोग होतो.

आवाजांत वजन, स्थिरपणा येण्यास व श्वासनियंत्रण साधण्यास आरंभींच सावकाश लईंत योग्य स्वरांवर चांगला मुक्काम करीत गाणें जरूर आहे. पहिल्याप्रथमच धांवपळीनें गाण्याचा रियाझ केला तर स्वर जाग्यावर लागणार नाहींत व गाण्यांत वजनहि राहणार नाहीं.

सुरवातीला ताना मारण्याची घाई करूं नये. आवाज स्थिर झाल्यानंतरच तानांच्या मेहनतीकडे वळावें. तान शुद्ध " आ " कारांत घ्यावी व तिचा वेग हळु हळु, स्वरस्थानाकडे नीट लक्ष देऊन वाढवीत जावा. कधीं कधीं " य-य-य " अशा किंवा जबड्याच्या ताना मोठमोठे गायक देखील घेतात. या तऱ्हेची तान कांहीं जुन्या उस्तादांनीं मुद्दाम, आवाज प्रतिकूल असतांहि मेहनतीनें साधली होती. त्यांची तऱ्हा त्यांच्या शिष्यपरंपरेंत उतरली व ही तान रूढ होऊन गेली आहे. पण शुद्ध ' आ ' काराची तान साधल्यास जबड्याच्या तानेची फारशी जरूर नाहीं. तिचा उपयोग कांहीं जोरदार गमकाच्या तानांत कधीं कधीं फार तर होऊं शकेल. तानेची कसरत करतांना, कधींहि स्वरांवर धक्के देत देत करूं नये. तसें केल्यानें गळा जड होईल; व जलद तान कधींहि निघणार नाहीं. स्पष्ट आवाजांत, ' आ ' कारांत, सहज लीलेनें, जेवढ्या गतींत तान साफ व सुस्वर निघेल तितक्याच गतींत ती फिरवावी. लहान लहान स्वरसमुदायांची सरळ उलटपालट, आरोहअवरोह करीत, व त्यांची जोड करीत करीत, तान फिरविली असतां ती चांगली तयार होईल. सरळ व वांक आरोहावरोहाची तानहि अशा कसरतीनें साधेल.

## रागदारी संगीताचा परिणाम सर्वसाधारण श्रोत्यांवर व्हावा तसा होत नाहीं याचीं कारणें

संगीताची वाढ लोकरुचीला अनुसरून होते हें मागें म्हटलेंच आहे. अभिरुचि हा नित्यपरिचयाचा परिणाम आहे. ज्या प्रकारचें गाणें लोकांच्या कानांवर नेहमीं पडत जाईल, त्या प्रकारचेंच गाणें त्यांना नेहमीं आवडत

जाईल. साधारण श्रोतृसमाजाला पक्क्या रागदारी संगीतांत, तें शब्द-प्रधान नसल्यामुळें किंवा शब्दोच्चार व शब्दार्थाकडे गायकांचें दुर्लक्ष असल्यामुळें, गोडी येत नाहीं. परकीय भाषेंतील व्याख्यानाप्रमाणेंच तें गाणें त्यांना वाटतें. गायकाच्या हातवाऱ्यांशिवाय त्यांना त्यांत कशाचाहि बोध होत नाहीं. अशांत अवास्तव तानांचा भडिमार पडत चालला म्हणजे श्रोते बिचारे हवालदेलच होतात. यामुळें रागदारी संगीताविषयीं त्यांना अनास्था वाटूं लागल्यास नवल नाहीं.

आजकाल रियाझी गायक किती आहेत? पूर्वी दिवसांतून बारा बारा तास मेहनत करून गळा कमाविलेल्या गायकांच्या गोष्टी आपण ऐकतों. त्या निवळ गप्पा नसून खरोखरीच तसले रियाझ करणार गायक होते, हें ज्यांना गायकांशीं विशेष सहवास घडला आहे त्यांना पटतें. तसा रियाझ करणारे आज बोटांवर मोजण्याइतकेहि नाहींत पण तसला रियाझ आजच्या काळांत करणें अगदीं अशक्य नाहीं, तरी फारच थोड्या लोकांना शक्य आहे. पूर्वी गायकांना राजाश्रय असे; नोकरी सुखाची असे; कधीं काळीं दरबारांत गाण्यावाजविण्यास जाण्याखेरीज करून त्यांना दुसरें कांहींच काम नसे. त्यामुळें हवा तेवढा रियाझ करण्यास सवड व भरपूर वेळ असे. आजचे गायक बहुतेक तालमीवरच पोट भरणारे असल्यामुळें, दिवसभर तालमींत घसा सुकवून आल्यानंतर त्यांच्याकडून एक तासहि रियाझ होणें अशक्य होतें. हा परिस्थितीचा दोष आहे. त्या गायकांचा नाहीं. पण रियाझाच्या अभावामुळें आवाजांत व गाण्यांत फिकेपणा येतो हेंहि खोटें नाहीं. रागदारी संगीतांत प्रत्येक स्वर न स्वर कसदार लागल्याशिवाय रागाचा इष्ट परिणाम होत नाहीं. मग श्रोत्यांना तें न आवडलें तर त्यांत त्यांचा काय दोष? आजकाल लोकगीत, काव्यगान, संगीत पदें, गझलें ठुमऱ्यांसारख्या शब्दप्रधान गीतांचा प्रादुर्भाव, हा उच्च संगीताच्या दारिद्र्याचाच परिणाम आहे.

# १२

## संगीतांत शब्दांचें महत्त्व

संगीतांत शब्दार्थांचें महत्त्व या विषयावर अलिकडे आमच्या विद्वानांचें लक्ष लागलें आहे. कवि व गायक यांत "मदर्थायत्त्वम्" ची चढाओढ सुरू आहे. संगीत हे रसानुवादी असावें ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु सध्यां प्रचारांत असलेल्या, व लोकाभिरुचीला पसंत असलेल्या "रागदारी" संगीतांत शब्दांचें महत्त्व फार नसतें असें बहुतेक गायकांचें मत आहे. शब्दांना आळविणारीं गीतें, ठुमरी, गझल, भजन, चैती, कजरी, सावन, वगैरे आहेतच. ख्याल गायनांत शब्दांच्या अर्थाकडे मुद्दाम लक्ष देऊन गाणारा सध्यां क्वचितच मिळतो. शब्दार्थाला व रागाला सयुक्तिक असा विस्तार होऊं शकला तर तो इष्टच आहे व या दृष्टीनें भावी संगीताची वाढ झाली पाहिजे. पण द्रुतगतींत, तान वगैरे घेतांना शब्दार्थाला सांभाळून गाणें जवळजवळ अशक्यच होतें. उदाहरणार्थ, "आज राधे तोरे बदन पर श्याम मिलै की चौरी" या रामकलीतल्या ख्यालांत रागाची सावकाश बढत चीजेच्या शब्दार्थाला धरून चांगली होऊं शकेल, पण पुढें द्रुत ताना घेतांना बिचाऱ्या राधेला खाकोटीला मारूनच पळावें लागेल. तें नको असलें तर द्रुत लयींत न जातां ख्याल मध्येंच आटोपता घ्यावा लागेल. पण हें व्हावें कसें? आजकाल तान हें ख्यालाचें एक महत्त्वाचें अंगच रूढ होऊन बसलें आहे, व श्रोतेहि तें ऐकण्याला सोकावलेले आहेत. तानांशिवाय गाइलेला ख्याल म्हणजे पक्वान्नावांचून केलेलें प्रयोजन असें त्यांना वाटतें. रसपरिपोषाकडे दुर्लक्ष करून बांधलेल्या कांहीं चीजांचे शब्द रागांच्या प्रकृतिला साजेलसे नसतात. उदाहरणार्थ "हूं तो जनम न छांडूं, निसदिन प्रेम पिया के संग" या शब्दांत कामिनीच्या हृदयाचे उद्गार आहेत. हेंच पद जैजैवंती, देसी वगैरे सारख्या स्त्री प्रकृतिक रागांत असते तर शब्दार्थाला सांभाळून रागविस्तार उत्तम झाला असता पण रसांविषयीं अज्ञानामुळें, चीज बांधणारानीं ती गंभीर प्रकृतीच्या कामोदांत बांधली आहे.

कामोदांत या शब्दांकडे विशेष लक्ष देऊन गाणें कठिणच पडणार. आतां नवीन चीजा बनतील व त्या रूढ होतील तोंपर्यंत जुन्या चीजांच्या शब्दार्थांवर भर देऊन, रागांच्या प्रकृतिला व आपल्या घराण्याच्या गायकीला बिघडविण्याला कोणीच सांप्रदायिक गायक कबूल होणार नाहीं असें वाटतें. पुनः नवीन चीजा बनविणारा स्वतः उत्तम गायक व तसाच उत्तम कवि असेल तरच तो यशस्वी होईल. जुन्या चीजांपैकीं फारच थोड्या राग व रस यांकडे लक्ष देऊन बांधल्या आहेत. रागांना मूर्त स्वरूपें देऊन, त्यांचीं स्पष्ट आदर्शस्वरूपें आठवणीसाठीं, उदाहरणादाखल कांहींतरी शब्दांच्या चौकटींत करून ठेवणें एवढाच त्यांत हेतु असावा. या चीजांत रागांचा ठळक अंगें संकलित करून, पाठ करण्यासाठीं रागांचीं आदर्शस्वरूपें म्हणून त्या बनविलेल्या असाव्यात. गायकाला एखाद्या रागांत एखादा सुंदर तुकडा सुचतो. तो सांभाळून ठेवण्यासाठीं कांहीं तरी शब्दांची ठेवण लागते. त्या तुकड्याला योग्य अशीं अक्षरें, विशेष काव्यप्रसादाच्या फंदांत न पडतां, पसंत करून त्यांत तो बांधितो. जुन्या गीतांचे विषय बहुतेक ठरलेले म्हणजे, कृष्णलीला, ऋतुवर्णन, ईशस्तुति व क्वचित् संगीताचे मूळ सिद्धांत असे होत. त्या तुकड्याचे नादसौंदर्य शब्दार्थांत व्यक्त करणें केव्हां केव्हां अशक्य असतें. अर्थात, भावी पिढीनें नवीन गीतें रागरसांकडे लक्ष देऊन बांधावीं, व त्यांचा आलापप्रसारही त्या भर्तीवरच करावा; व तसें केल्यास दुधांत साखर पडल्यासारखें होणार आहे. परंतु सध्याच्या खानदानी चिजा रागरसानुवर्तक नाहींत, यागोष्टीकडे दुर्लक्षच केलें पाहिजे; व त्यांची मोडतोड करण्याच्या भानगडींत न पडलेलें बरें.

## संगीताचें मराठीकरण

संगीताचें मराठीकरण ही कल्पना तरी या गीतांतल्या शब्दार्थ लावण्याच्या कल्पनेचीच एक शाखा आहे. गाणारे, त्यांना कसलेहि शब्द मिळाले तरी त्यांची तोडमोड करून ते आपल्या आलाप व

ात्य संगीताला 'नांवें ठेवतां ठेवतां, विलायतेला जाऊन त्या लोकांचे 'फनीज्' व 'ऑपेराज्' वगैरे ऐकून, पहिल्यानें कांहीं दिवस नाक मुरडून, संगतीचा नेहमीं नेहमीं कानावर पडून विशेष परिचय झाला व त्याचें य कळूं लागलें म्हणजे, त्याचे गोडवे गात परत येतात हेंच होय.

संगीताच्या सौंदर्याची प्रचीति येण्याला आपले कान तयार झाले पाहिजेत उक्तिचें रहस्य तरी हेंच होय. संसर्गाचा परिणाम चिरस्थायी असतो. ानपणीं किंवा आपली संगीताशीं नवीनच ओळख होत असतां ज्या यकाच्या गाण्यानें आपल्याला या कलेची रुचि लागलेली असते, तो गायक त्याचें गाणें, वस्तुतः फार उच्च प्रतीचें नसलें तरी, या गोष्टीची जाणीव डे विशेष अभ्यासानें आपणास झाली असली तरी, आपल्याला इतरांपेक्षां धिक प्रिय वाटतो. त्या गायकापेक्षां कितीहि विद्वान व कुशल गायक ानंतर आपण ऐकिले तरी त्यांचें वजन इतकें आपणांवर पडत नाहीं, ही नुभवाची गोष्ट आहे. प्रत्येक गायकाचे केवळ भक्तच असे कितितरा असतात. कांहीं प्रसंगीं तर प्रत्यक्ष गायक गायक एकाच बाजूला राहून त्यांच्या क्तां भक्तांतच भांडणें झालेली पाहून मोठी मौज वाटते. एका गायकाच्या भक्तांनीं दुसऱ्या गायकाला शिव्यांची लाखोली वाहिलेली आपण नेहमीं ऐकतों. गायक आपसांत स्नेहभावानेंच वागतात. क्वचित् धंद्याच्या चढाओढींत एका गायकानें दुसऱ्याची निंदा केली तरी ते एकमेकांची किंमत ओळखून असतात. हीं भक्तांभक्तांतलीं भांडणें कानांवर गेलीं तर त्या गायकांना सुद्धां हंसूं आल्यास नवल नाहीं. या भक्तांना अमुक गायक तुम्हांला कां आवडतो व दुसरे कां आवडत नाहींत असा प्रश्न केला तर कांहींतरी न पटण्यासारखें उत्तर मिळतें. त्याचें कारण त्यांना सांगतां येत नाहीं. पण त्यांचा आदर किंवा अनादर हा मनापासूनचा असतो यांत शंका नाहीं. याला दुसरें कारण शोधूं गेल्यास मिळणार नाहीं. संसर्गाचाच हा परिणाम हेंच शेवटीं म्हणावें लागतें.

जसा गायकाविषयीं व्यक्तिगत आदर श्रोत्यांत असतो, तसाच त्याच्या
ली, ढंग वगैरे बद्दलहि असतो. ज्या प्रकारच्या गाण्याचा संसर्ग श्रोत्यांस
शेष असतो त्याच प्रकारचें गाणें त्यांना पसंत असतें. गायकांचीं घराणींहीं
चींच द्योतक आहेत. कुशल गायकाच्या गाण्याचा रंग त्याच्या
ष्यानुशिष्यांच्या गाण्यांत उतरतो व ती एक गायकी कायम होते, व
यकपरंपरा तशीच श्रोतृपरंपराहि प्रस्थापित होते.

## आजकालच्या परिस्थितिचा मैफलींवर परिणाम

आजचा काळ घाईचा आहे. बसल्या बरोबर आवाज लागणारा व दहा
निटांत एक चीज संपविणारा गायक आज लोकांना हवा आहे. रात्रभर
याच्या आवाजासंगती व तबियती संगतीं रेंगाळत बसण्यास श्रोत्यांना
नाहीं. गाणाराची तबियत रुजूं होते न होते तोंच एखादा श्रोता
च आपल्या मनगटावरील घड्याळाकडे पाहूं लागतो. तो एखादा असला
चाणाक्ष गायकाच्या तबियतीचा विरस करण्याला पुरे होतो. गाणें
ललें असतां बाजारभावाच्या गोष्टी करणाऱ्या अरसिक लोकांविषयीं
पण ऐकतोंच. पण वर म्हटलेल्या सारखा श्रोता फारच भयंकर.
याळाकडे पाहून तो जणूं काय गायकाला "हं, हें ऐकलें, आतां पुढें
ा." अशीच सूचना देतो. अशा श्रोत्यांना थोडें गाण्याचें ज्ञानहि असतें.
ते नुसते नमुने ऐकणारांपैकीं असतात. वरवर ऐकून, "अशा प्रकारच्या
ांत अशी ही चीज आहे", एवढेंच समजण्याची त्यांची जिज्ञासा असते.

आजकाल गायकाची परीक्षा, तो गळा किती जलद फिरवूं शकतो,
लजीशीं धुमश्चक्री करण्यांत पट्टा आहे कीं नाहीं, रागांत नवेनवे स्वर
ूं शकतो कीं नाहीं, हातापायांची धिंगामस्ती विशेष करतो कीं काय,
तव्या पट्टींत गातो, उंच स्वरांत गाऊनहि तार सप्तकाच्या उत्तरांगापर्यंत
ोचतो की नाहीं, ऐटींत बसतो कीं नाहीं, मधून मधून चटकदार चीजा

श्चात्त्य संगीताला 'नांवें ठेवतां ठेवतां, विलायतेला जाऊन त्या लोकांचे' ःम्फनीज्' व 'ऑपेराज्' वगैरे ऐकून, पहिल्यानें कांहीं दिवस नाकं मुरडून, या संगतीचा नेहमीं नेहमीं कानावर पडून विशेष परिचय झाला व त्याचें ःस्य कळूं लागलें म्हणजे, त्याचे गोडवे गात परत येतात हेंच होय.

संगीताच्या सौंदर्याची प्रचीति येण्याला आपले कान तयार झाले पाहिजेत । उक्तिचें रहस्य तरी हेंच होय. संसर्गाचा परिणाम चिरस्थायी असतो. ल्हानपणीं किंवा आपली संगीताशीं नवीनच ओळख होत असतां ज्या ाायकाच्या गाण्यानें आपल्याला या कलेची रुचि लागलेली असते, तो गायक ; त्याचें गाणें, वस्तुतः फार उच्च प्रतीचें नसलें तरी, या गोष्टीची जाणीव ुढें विशेष अभ्यासानें आपणास झाली असली तरी, आपल्याला इतरांपेक्षां अधिक प्रिय वाटतो. त्या गायकापेक्षां कितिहि विद्वान व कुशल गायक त्यानंतर आपण ऐकिले तरी त्यांचें वजन इतकें आपणांवर पडत नाहीं, ही अनुभवाची गोष्ट आहे. प्रत्येक गायकाचे केवळ भक्तच असे कितितरी असतात. कांहीं प्रसंगीं तर प्रत्यक्ष गायक गायक एकाच बाजूला राहून त्यांच्या भक्तां भक्तांतच भांडणें झालेली पाहून मोठी मौज वाटते. एका गायकाच्या भक्तांनीं दुसऱ्या गायकाला शिव्यांची लाखोली वाहिलेली आपण नेहमीं ऐकतों. गायक आपसांत स्नेहभावानेंच वागतात. क्वचित् धंद्याच्या चढाओढींत एका गायकानें दुसऱ्याची निंदा केली तरी ते एकमेकांची किंमत ओळखून असतात. हीं भक्तांभक्तांतलीं भांडणें कानांवर गेलीं तर त्या गायकांना सुद्धां हंसूं आल्यास नवल नाहीं. या भक्तांना अमुक गायक तुम्हांला कां आवडतो व दुसरे कां आवडत नाहींत असा प्रश्न केला तर कांहींतरी न पटण्यासारखें उत्तर मिळतें. त्याचें कारण त्यांना सांगतां येत नाहीं. पण त्यांचा आदर किंवा अनादर हा मनापासूनचा असतो यांत शंका नाहीं. याला दुसरें कारण शोधूं गेल्यास मिळणार नाहीं. संसर्गाचाच हा परिणाम हेंच शेवटीं म्हणावें लागतें.

जसा गायकाविषयीं व्यक्तिगत आदर श्रोत्यांत असतो, तसाच त्याच्या शैली, ढंग वगैरे बद्दलहि असतो. ज्या प्रकारच्या गाण्याचा संसर्ग श्रोत्यांस विशेष असतो त्याच प्रकारचें गाणें त्यांना पसंत असतें. गायकांचीं घराणींहीं याचींच द्योतक आहेत. कुशल गायकाच्या गाण्याचा रंग त्याच्या शिष्यानुशिष्यांच्या गाण्यांत उतरतो व ती एक गायकी कायम होते, व गायकपरंपरा तशीच श्रोतृपरंपराहि प्रस्थापित होते.

## आजकालच्या परिस्थितिचा मैफलींवर परिणाम

आजचा काळ घाईचा आहे. बसल्या बरोबर आवाज लागणारा व दहा मिनिटांत एक चीज संपविणारा गायक आज लोकांना हवा आहे. रात्रभर गवैयाच्या आवाजासंगती व तबियती संगतीं रेंगाळत बसण्यास श्रोत्यांना वेळ नाहीं. गाणाराची तबियत रुजूं होते न होते तोंच एखादा श्रोता लगेच आपल्या मनगटावरील घड्याळाकडे पाहूं लागतो. तो एखादा असला तरी चाणाक्ष गायकाच्या तबियतीचा विरस करण्याला पुरे होतो. गाणें चाललें असतां बाजारभावाच्या गोष्टी करणाऱ्या अरसिक लोकांविषयीं आपण ऐकतोंच. पण वर म्हटलेल्या सारखा श्रोता फारच भयंकर. घड्याळाकडे पाहून तो जणूं काय गायकाला "हं, हें ऐकलें, आतां पुढें चला." अशीच सूचना देतो. अशा श्रोत्यांना थोडें गाण्याचें ज्ञानहि असतें. पण ते नुसते नमुने ऐकणारांपैकीं असतात. वरवर ऐकून, "अशा प्रकारच्या गाण्यांत अशी ही चीज आहे", एवढेंच समजण्याची त्यांची जिज्ञासा असते.

आजकाल गायकाची परीक्षा, तो गळा किती जलद फिरवूं शकतो, तबलजीशीं धुमश्चक्री करण्यांत पट्टा आहे कीं नाहीं, रागांत नवेनवे स्वर लावूं शकतो कीं नाहीं, हातापायांची धिंगामस्ती विशेष करतो कीं काय, उंच्या पट्टींत गातो, उंच स्वरांत गाऊनहि तार सप्तकाच्या उत्तरांगापर्यंत पोंचतो की नाहीं, ऐटींत बसतो कीं नाहीं, मधून मधून चटकदार चीजा

पाश्चात्त्य संगीताला 'नांवें ठेवतां ठेवतां, विलायतेला जाऊन त्या लोकांचे' 'सिम्फनीझ्' व 'ऑपेराझ्' वगैरे ऐकून, पहिल्यानें कांहीं दिवस नाकं मुरडून, त्या संगतीचा नेहमीं नेहमीं कानावर पडून विशेष परिचय झाला व त्याचें रहस्य कळूं लागलें म्हणजे, त्याचे गोडवे गात परत येतात हेंच होय.

संगीताच्या सौंदर्याची प्रचीति येण्याला आपले कान तयार झाले पाहिजेत या उक्तिचें रहस्य तरी हेंच होय. संसर्गाचा परिणाम चिरस्थायी असतो. लहानपणीं किंवा आपली संगीताशीं नवीनच ओळख होत असतां ज्या गायकाच्या गाण्यानें आपल्याला या कलेची रुचि लागलेली असते, तो गायक व त्याचें गाणें, वस्तुतः फार उच्च प्रतीचें नसलें तरी, या गोष्टीची जाणीव पुढें विशेष अभ्यासानें आपणास झाली असली तरी, आपल्याला इतरांपेक्षां अधिक प्रिय वाटतो. त्या गायकापेक्षां कितिहि विद्वान व कुशल गायक त्यानंतर आपण ऐकिले तरी त्यांचें वजन इतकें आपणांवर पडत नाहीं, ही अनुभवाची गोष्ट आहे. प्रत्येक गायकाचे केवळ भक्तच असे कितितरी असतात. कांहीं प्रसंगीं तर प्रत्यक्ष गायक गायक एकाच बाजूला राहून त्यांच्या भक्तां भक्तांतच भांडणें झालेली पाहून मोठी मौज वाटते. एका गायकाच्या भक्तांनीं दुसऱ्या गायकाला शिव्यांची लाखोली वाहिलेली आपण नेहमीं ऐकतों. गायक आपसांत स्नेहभावानेंच वागतात. क्वचित् धंद्याच्या चढाओढींत एका गायकानें दुसऱ्याची निंदा केली तरी ते एकमेकांची किंमत ओळखून असतात. हीं भक्तांभक्तांतलीं भांडणें कानांवर गेलीं तर त्या गायकांना सुद्धां हंसूं आल्यास नवल नाहीं. या भक्तांना अमुक गायक तुम्हांला कां आवडतो व दुसरे कां आवडत नाहींत असा प्रश्न केला तर कांहींतरी न पटण्यासारखें उत्तर मिळतें. त्याचें कारण त्यांना सांगतां येत नाहीं. पण त्यांचा आदर किंवा अनादर हा मनापासूनचा असतो यांत शंका नाहीं. याला दुसरें कारण शोधूं गेल्यास मिळणार नाहीं. संसर्गाचाच हा परिणाम हेंच शेंवटीं म्हणावें लागतें.

जसा गायकाविषयीं व्यक्तिगत आदर श्रोत्यांत असतो, तसाच त्याच्या शैली, ढंग वगैरे बद्दलहि असतो. ज्या प्रकारच्या गाण्याचा संसर्ग श्रोत्यांस विशेष असतो त्याच प्रकारचें गाणें त्यांना पसंत असतें. गायकांचीं घराणींहीं याचींच द्योतक आहेत. कुशल गायकाच्या गाण्याचा रंग त्याच्या शिष्यानुशिष्यांच्या गाण्यांत उतरतो व ती एक गायकी कायम होते, व गायकपरंपरा तशीच श्रोतृपरंपराहि प्रस्थापित होते.

## आजकालच्या परिस्थितिचा मैफलींवर परिणाम

आजचा काळ घाईचा आहे. बसल्या बरोबर आवाज लागणारा व दहा मिनिटांत एक चीज संपविणारा गायक आज लोकांना हवा आहे. रात्रभर गवैयाच्या आवाजासंगती व तबियती संगतीं रेंगाळत बसण्यास श्रोत्यांना वेळ नाहीं. गाणाराची तबियत रुजूं होते न होते तोंच एखादा श्रोता मधेंच आपल्या मनगटावरील घड्याळाकडे पाहूं लागतो. तो एखादा असला तरी चाणाक्ष गायकाच्या तबियतीचा विरस करण्याला पुरे होतो. गाणें चाललें असतां बाजारभावाच्या गोष्टी करणाऱ्या अरसिक लोकांविषयीं आपण ऐकतोंच. पण वर म्हटलेल्या सारखा श्रोता फारच भयंकर. घड्याळाकडे पाहून तो जणूं काय गायकाला "हं, हें ऐकलें, आतां पुढें चला." अशीच सूचना देतो. अशा श्रोत्यांना थोडें गाण्याचें ज्ञानहि असतें. पण ते नुसते नमुने ऐकणारांपैकीं असतात. वरवर ऐकून, "अशा प्रकारच्या रागांत अशी ही चीज आहे", एवढेंच समजण्याची त्यांची जिज्ञासा असते.

आजकाल गायकाची परीक्षा, तो गळा किती जलद फिरवूं शकतो, तबलजीशीं धुमश्चक्री करण्यांत पट्टा आहे कीं नाहीं, रागांत नवेनवे स्वर लावूं शकतो कीं नाहीं, हातापायांची धिंगामस्ती विशेष करतो कीं काय, कितव्या पट्टींत गातो, उंच स्वरांत गाऊनहि तार सप्तकाच्या उत्तरांगापर्यंत पोहोंचतो की नाहीं, ऐटींत बसतो कीं नाहीं, मधून मधून चटकदार चीजा

एकवतो कीं नाहीं, या गोष्टींवर आहे. अलिअलीकडे तर पाश्चात्य संगीता-सारखे कांहीं प्रकार गायक वादकांना करावे लागतात. राग शुद्धता, चीज म्हणण्याचा ढंग, आवाज लावण्याची तऱ्हा, स्वरविन्यास रचण्याचें कौशल्य, स्वरांवरचे मुक्काम, स्वरस्थानें, गायकीची पद्धत, कसलेल्या गळ्यांत साहजिक लागणारे कण, लयींचे चमत्कार, समेवर येण्याची खुबी, समप्रकृतिक रागांपासून प्रस्तुत रागाला वांचविण्याच्या युक्त्या, स्वरांचें परस्पर अल्पत्त्व व बहुत्त्व, व रागाच्या एकंदर स्वरूपाचा मनावर होणारा परिणाम या गोष्टींकडे क्वचितच कोणाचें लक्ष असतें. अर्थात् ही स्थिति फारच अनिष्ट आहे. या मालिकेंत दिलेल्या खानदानी चिजांचा मुख्य हेतू, या बाबतींवर भर टाकण्याचा आहे, व राग, शब्दार्थ व रस यांची सांगड घालण्याचा नाहीं.

## संगीतविद्यार्थ्यांची प्रगति

कोणाच्याहि संगीत शिक्षणाचा इतिहास मोठा मौजेचा असतो. त्यांत साधारणतः तीन पायऱ्या असतात. प्रथम नुसता नादलुब्धपणा असतो. कोणाचें तरी सुस्वर व गोड गाणें ऐकून गाण्याची रुचि उत्पन्न होते. या स्थितींत रागशुद्धि वगैरे गोष्टींकडे त्याचें लक्ष नसतें. नुसतें गोड लागलें त्यांत शब्द चांगले असले म्हणजे त्याला तें गाणें पसंत पडतें. पुढें, हा इतका अलौकिक सौंदर्याचा ठेवा आपल्यापाशींहि असावा अशी इच्छा होऊन त्याला संगीत विद्या शिकण्याची इच्छा होते. साधारण स्वरज्ञान व रागज्ञान झाल्यानंतर त्यांची वृत्ति चिकित्सक, किंबहुना छिद्रान्वेषी होते. ही दुसरी स्थिति. या स्थितींत असतांना, आपण शिकल्याप्रमाणें हुबेहुब कोणीं गाइलें नाहीं तर त्यास तो गाणारा चूक आहे असें वाटतें. पण पुढें चांगल्या चांगल्या लोकांचीं गाणीं कानांवर पडल्यानंतर व विशेष अभ्यास झाल्यानंतर मग त्याला, गायक व शैलीचें वैचित्र्य, रागांतर्गत स्वरांच्या परस्पर अल्पत्त्वबहुत्त्वाचें रहस्य, स्वरोच्चारांचें विविधत्त्व हीं कळून

येतात. रागांत स्वरविन्यासांची जोड लावण्यांतच सारी कुशलता असते. निपुण गायकांचें रागावर पूर्ण स्वामित्त्व असतें. तो रागाचा दास नसतो. कधीं रागाला आंजारीत गोंजारीत, कधीं त्याशीं लपंडाव खेळत, कधीं भक्तिभावानें त्याची पूजा करीत, गायक त्यांत स्वतः लीन होऊन, श्रोत्यांस आपल्या संगतीं चालवीत असतो. आणि हें ओळखणाऱ्या श्रोत्यांची त्याला फारच किंमत वाटते. या तिसऱ्या स्थितीला पोहोंचलेले श्रोते बहुधा स्वतःच कुशल गायक असतात. गातां गातां मध्येंच कोठून "आतां एकादें सौभद्र नाहींतर स्वयंवर होऊं द्या" अशी फरमास आली म्हणजे ढेंकूळ मारल्याप्रमाणेंच त्या बिचाऱ्या गायकाची स्थिति होऊन जात असेल. गायकलोकांत अशी एक म्हण आहे "कद्रदान हमारे गुलाम और बेकद्रके हम गुलाम".

सारांश संगीताची प्रगति गायक वादकांवर तितकीच श्रोत्यांवरहि अवलंबून असते. लोकरुचीला वळण लावणारे गायक वादक व त्यांच्या कलेला पुनः वळण लावणारी लोकरुचि असा हा परस्पर संबंध आहे.

## राग व रस

रागांच्या सौंदर्याचें मूळ शोधून काढतां काढतां रागांतून रस उत्पन्न करण्याचा उपक्रम सुरूं झाला आहे. व त्यालाच जोडून पुढें सांसारिक जीवनाशीं संगीताचा संबंध जोडण्याचे प्रयत्न कित्येक ठिकाणीं सुरूं आहेत. थोडक्यांत म्हणायचें म्हणजे संगीताची सगुण उपासना सुरू होत आहे, या परिस्थितीला नांवें ठेवण्याचा उद्देश येथें नाहीं. या गोष्टी अपरिहार्य आहेत. संगीतकला ही आतां लोकाश्रयी झाल्यामुळें, जनरुचीला अनुसरून असले प्रकार होणें साहजिक आहे.

काव्य, चित्रकला व संगीत यांची सांगड घालण्याची वहिवाट जुनीच आहे. कांहीं मर्यादेपर्यंत या तीन्ही कलांच्या फलनिष्पत्तींत साम्य असावें

असा भास होतो. वास्तविक ' रस ' काव्यान्तर्गत विषय आहे. पण वर निर्दिष्ट केलेल्या कारणामुळें रागांतूनहि रसोत्पत्ति व्हावी असें आम्हांस वाटल्यास नवल नाहीं. संगीताला आवाजाशिवाय दुसरें साधन नाहीं. नुसत्या आवाजाविषयीं म्हटलें तर हंसणें, रागावणें, रडणें, लाडाचा आवाज काढणें भीतीनें किंवा आश्चर्यानें ओरडणें इत्यादि गोष्टींनीं लगेच ते आवाज काढणाऱ्या व्यक्तीच्या मनःस्थितीची जाणीव होते. पण हे आवाज एकमेकांपासून किती उच्चनीच असतात हें जाणणें, त्यांचें स्वरलेखन करणें, व ते कोणत्या रागांत कसे उपयोगीं होतील याचा निर्णय करणें, ते कोणत्याहि उपलब्ध रागांत खपत नसल्यास त्या त्या रसांचे परिपोषक असे नवीन राग उत्पन्न करणें हें ओघानेंच आलें. लयीचा व शब्दांचा आधार स्वरांना घेतल्यास कांहीं अंशीं हें साध्य होईल.

रसपरिपोष हें संगीताच्या विविध फलांपैकीं एक आहे. राग व रस या विषयाची तात्त्विक चर्चा अजून व्हावयाची आहे. हा विषय वाटतो तितका सोपा नाहीं. नुसतें " सरीवीरेद्भुते रौद्रे " इत्यादि प्राचीन ग्रंथोक्तींचे आधार आजकालच्या स्वरांना व रागांना लागूं करून हा प्रश्न सुटला असें होत नाहीं. ज्या ग्रंथांचीं अवतरणें आम्हीं आधारादाखल घेऊं, त्यांचे स्वर व आजकालचे स्वर हे नाम व लक्षण यांनीं एकच आहेत काय, हा प्रश्न सोडविल्याखेरीज हे आधार निर्मूल आहेत. शिवाय स्वर हे सापेक्ष आहेत. पूर्वीच्या जाती गायनांत पर्यायांश सुद्धां असत. तेव्हां एकाच जातींत निरनिराळ्या स्वरांना केंद्रस्थान देऊन निरनिराळे परिणाम उत्पन्न करणें याचा प्रचार त्यावेळीं गायनांत होता. केंद्रस्थान बदलल्यानें रागांतील इतर स्वरांवरहि परिणाम होतो हें अनुभवसिद्ध आहे. तेव्हां कोणत्या स्वराचा व रागाचा कोणता रस हें ठरविणें निदान आजकालच्या संगीतांत फारच कठिण आहे. त्यांत किती तरी गोष्टींचा विचार करावा लागणार आहे. हें पाहतां हें काम सोपें नाहीं याची कल्पना सहजच येईल. एकच राग

विविध गायकांनीं, विविध प्रसंगीं, विविध श्रोत्यांसमोर, विविध प्रकारचीं गीतें गाऊन एकच परिणाम झाला तर त्या रागाचा अमुकच रस असें ठरवितां येईल. यांत किती प्रकारचे प्रयोग करून पहावे लागतील! एकाच गायकाची मनःस्थिति नेहमीं सारखी असेल असें नाहीं. तेंच श्रोत्यांविषयींहि म्हणतां येईल. ठरीव राग गाण्याला वातावरण दरखेपेस एकाच प्रकारचें असेल असाहि नियम नाहीं. सारे गाणारे एकच राग एकाच शैलीनें गातील असाहि नियम नाहीं. उलट गायक कुशल असला तर एकच राग निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या रंगांनीं गाऊं शकतो. तो ज्या मनःस्थितींत असेल तसा त्याचा राग वठतो. या सर्व विविध प्रयोगांतून सुरक्षित पार पडून, रागाचा परिणाम एकच झाला तर मात्र त्याचा निश्चय होऊं शकेल.

विचाराअन्तीं असें वाटूं लागतें कीं, रागांचा प्रत्यक्ष संबंध रसांशीं लावणें अत्यंत कठिण आहे. भावना उत्पन्न होण्याला गाण्याची शैली, योग्य आवाज, उच्चार, गाण्याची लय, गीतांतले शब्द, किंचित् अभिनय या गोष्टीहि रसोत्पत्तीला आवश्यक आहेत. यांच्या यथायोग्य प्रयोगानें रसांचा बराच परिपोष होतो. आतां कांहीं ठोकळ विधानें कोणी करूं शकेल. जसें मोठाल्या स्वरांतरांनीं करुण किंवा शांत रस उत्पन्न होणार नाहीं तसेंच लहान स्वरांतरांनीं वीर किंवा रौद्र रसाची भावना होणें अशक्य आहे. शंकरा, मालश्री, कामोद, केदार, हमीर, नट, वगैरे रागांत शांत किंवा करुण रस उत्पन्न करण्याचा प्रयत्न त्या रागांच्या साधारण स्वभावाला जुळणार नाहीं. तसेंच श्री, भैरव, जोगिया, आसावरी, तोडी, पीलु, भैरवी वगैरे रागांत रौद्र किंवा वीर रस उत्पन्न होणार नाहीं. पण हेहि एक प्रकारचे तर्क आहेत असें समजायच. रागांचे नुसते आलाप केले किंवा बीनावर जोडकाम केलें तर कोणता रस होईल हें सांगतां येणार नाहीं. ते राग ऐकल्यानें मनावर परिणाम जरूर होतो. प्रत्येक राग आपापला विशिष्ट परिणाम श्रोत्यांच्या मनावर

